नागरी जमीन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ मधील कलम २० अन्वये मंजूर करण्यात आलेल्या भूखंड विकास योजनेतील भूखंडाच्या एकत्रीकरणाबाबत.

**महाराष्ट्र शासन**

**नगर विकास विभाग**

**शासन निर्णय क्रमांक : मुदत २०१४/प्र.क्र.५९/नाजकधा-२**

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : ०१ ऑगस्ट, २०१५.

**संदर्भ** :- १) शासन निर्णय क्र.युएलसी-१०(२००६)/५८६/नाजकधा-२, दि.१२ एप्रिल, २००७

२) शासन निर्णय क्र.युएलसी-१०(२००६)/५८६/नाजकधा-२, दि.०८ नोव्हेंबर, २००७

३) शासन निर्णय क्र.मुदत २०१४/प्र.क्र.५९/नाजकधा-२, दि.१८ फेब्रुवारी, २०१५

**प्रस्तावना:-**

नागरी जमीन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ च्या कलम २० अन्वये राज्यातील नागरी समुहामध्ये भूखंड विकास योजना मंजुर करण्यात आल्या आहेत. सदर भूखंड विकास योजनेतील भुखंडाचे एकत्रिकरण व त्यावर बहुमजली इमारतींचे बांधकाम करण्यास परवानगी देण्याबाबतचा शासन निर्णय दि.८ नोव्हेंबर, २००७ रोजी निर्गमित करण्यात आला. सदर धोरणानुसार नाजकधा कलम २० खालील भूखंडविकास योजनेमधील भूखंडाच्या एकत्रिकरणाचे प्रस्ताव शासनास सादर करण्याबाबत संदर्भ क्र.३ वरील शासन निर्णयानुसार कळविण्यात आले होते. परंतु राज्यातील नागरी समुहातील मंजूर केलेल्या भूखंडविकास योजनेतील भूखंडांच्या एकत्रिकरणाबाबत निर्णय घेण्याचे अधिकार सक्षम प्राधिकारी नागरी समुह यांच्या स्तरावर दिल्यास योजनाधारकांच्या प्रस्तावावर जलद गतीने निर्णय होणे शक्य होईल. याबाबीचा विचार करता शासनाने पुढील प्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय:-**

नागरी जमिन (कमाल धारणा व विनियमन) अधिनियम, १९७६ मधील कलम २० अन्वये मंजूर करण्यात आलेल्या भूखंड विकास योजनेतील भूखंडांच्या एकत्रीकरणबाबत संदर्भ क्र.१ व २ वरील शासन निर्णयानुसार धोरण निश्चित करण्यात आले आहे. सदर योजनांची अंमलबजावणी तात्काळ होणे शक्य व्हावे म्हणून यासंदर्भात मा.सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली यांचेसमोर प्रलंबित असलेली विशेष अनुमती याचिका क्र.८८१८/२००९ मधील अंतीम निर्णयाच्या अधिन राहून भूखंड विकास योजनेतील भूखंडाच्या एकत्रिकरणबाबत, संदर्भ क्र.२ वरील शासन निर्णयात नमुद धोरणानुसार निर्णय घेण्याचे अधिकार सक्षम प्राधिकारी, नागरी समूह यांना प्रदान करण्यात येत आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०८०३१४३७५८२४२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

Siddharam K Salimath

Digitally signed by Siddharam K Salimath
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Deputy Secretary, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Siddharam K Salimath
Date: 2015.08.03 15:35:43 +05'30'

**( एस.के.सालीमठ )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन.

**प्रति,**

१) मा.राज्यपालांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.

२) मा.मुख्यमंत्री यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

३) मा.राज्यमंत्री (नगर विकास) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.

४) मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय, मुंबई.

५) मा.प्रधान सचिव (नवि-१), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुबई.

६) अपर जिल्हाधिकारी व सक्षम प्राधिकारी, मुंबई / पुणे / नागपूर / नाशिक / ठाणे.

७) उपजिल्हाधिकारी व सक्षम प्राधिकारी, उल्हासनगर / सोलापूर / कोल्हापूर / सांगली.

८) उप सचिव (नाजकधा) यांचे स्वीय सहाय्यक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

९) कक्ष अधिकारी (नाजकधा-१, २, ३), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

१०) निवडनस्ती (नाजकधा-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.